नायब तहसीलदार (गट-ब) संवर्गातून तहसीलदार (गट-अ) संवर्गात पदोन्नतीसाठी सक्षम प्राधिका-यास शिफारस करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठित करण्याबाबत.......

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक :- पदोन १९२०/प्र.क्र.१२/ई-३
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- ०६.०२.२०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही -२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन -१२, दिनांक ०१.०८.२०१९
२) शासन निर्णय क्र. महसूल व वन विभाग क्र.एसएलएल-१२८९/५७४(अ)/ई-३, दि.२७.०६.१९८९

प्रस्तावना :-

महाराष्ट्र तहसीलदार (सेवा प्रवेश ) नियम,१९८९ नुसार तहसीलदार हा विभागीय संवर्ग असल्याने नायब तहसीलदार (गट-ब) संवर्गातून तहसीलदार (गट-अ) संवर्गात पदोन्नती करीता संदर्भ क्र.०२ अन्वये पात्र असणा-या नायब तहसीलदारांची, तहसीलदार या पदावर पदोन्नती देण्यासाठी निवडसूची तयार करण्यासाठी, खालील प्रमाणे समिती गठित करण्यात आली होती. :-

| | | |
|---|---|---|
| १) संबधित विभागीय आयुक्त | : | अध्यक्ष |
| २) संबधित राजपत्रित आस्थापनेचे नियंत्रण असलेले महसूल व वन विभागातील उप सचिव | : | सदस्य |
| ३) संबधित विभागीय आयुक्तांनी नामनिर्देशित केलेले एक ज्येष्ठ जिल्हाधिकारी किंवा अपर जिल्हाधिकारी | : | सदस्य |
| ४) संबधित सहाय्यक आयुक्त (महसूल) | : | सदस्य सचिव |

२. राज्य शासकीय सेवेमध्ये पदोन्नतीसाठी पात्र अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरीता अनुसरावयाच्या कार्यवाही बाबतची एकत्रित मार्गदर्शक तत्वे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एसआरव्ही -२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दिनांक ०१.०८.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयनुसार बिगर मंत्रालयीन संवर्गाकरीता आस्थापना मंडळाच्या कार्यकक्षेत नसलेल्या गट-अ मधील सर्व पदांवर पदोन्नतीकरीता संबधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे सचिव/ प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली

विभागीय पदोन्नती समितीची तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार नायब तहसीलदार (गट-ब) संवर्गातून तहसीलदार (गट-अ) संवर्गात पदोन्नतीसाठी पात्र नायब तहसीलदारांची निवडसूची तयार करून नियुक्ती प्राधिका-यास शिफारस करण्यासाठी सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पदोन्नती समितीचे गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही -२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२ दिनांक ०१.०८.२०१९ मध्ये दिलेल्या सूचनानुसार नायब तहसीलदार (गट-ब) संवर्गातून तहसीलदार (गट-अ) संवर्गात पदोन्नतीसाठी पात्र नायब तहसीलदारांची निवडसूची तयार करून नियुक्ती प्राधिका-यास पदोन्नतीसाठी शिफारस करण्यासाठी महसूल विभागाचे सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे विभागीय पदोन्नती समिती गठित करण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **अधिका-याचे पदनाम** | **समितीचे पद** |
|---|---|---|
| १) | सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (महसूल) | अध्यक्ष |
| २) | ज्या महसूली विभागाकरीता विभागीय पदोन्नती समिती बैठक आयोजित केली आहे, त्या विभागाचे विभागीय आयुक्त (अमरावती/नागपुर/औरंगाबाद/नाशिक/पुणे/कोकण) | सदस्य |
| ३) | सह सचिव/ उप सचिव-ई-३ (तहसीलदार आस्थापना), महसूल व वन विभाग | सदस्य सचिव |

३. वरील विभागीय पदोन्नती समितीमध्ये मागास प्रवर्गाकरीता प्रतिनिधित्व करणारा एक सदस्य असेल, असा सदस्य नसल्यास, समिती अध्यक्षांच्या सहमतीने मागास प्रवर्गाचे प्रतिनिधीत्व करण्याकरीता एका अधिका-याचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करण्यात येईल.

४. **<u>विभागीय पदोन्नती समितीचे कार्यक्षेत्र खालीलप्रमाणे असेल:-</u>**

i. नायब तहसीलदार संवर्गातून तहसीलदार संवर्गात पदोन्नतीची शिफारस करण्यासाठी प्रस्ताव विचारात घेणे व सेवा प्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश/ मार्गदर्शक सूचना विचारात घेवून,

पदोन्नतीसाठी पात्र अधिका-यांची निवडसूची तयार करून नियुक्ती प्राधिका-यास पदोन्नतीसाठी शिफारस करणे.

ii. मानीव दिनांकाचे प्रस्ताव विचारात घेणे व सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश/ मार्गदर्शक सूचना विचारात घेवून, पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यासाठी नियुक्ती प्राधिका-यास शिफारस करणे.

५. विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीचे ठिकाण व वेळ समितीचे अध्यक्ष निश्चित करतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२०७१५२२३११८१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Veer

Digitally signed by Madhav Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forests Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22edaeda6d9d0b7d64088adc780cd25e6, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Veer
Date: 2020.02.07 15:27:52 +05'30'

**(डॉ. माधव वीर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. उप-मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. अपर मुख्य सचिव (महसूल) , महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व विभागीय आयुक्त (कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नाशिक)
८. उपसचिव, ई-१/ई१अ/ई-२/ई-३/ई४/ई-४अ/ई-९ यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडसूची कार्यासन ई-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.